**सन २०२२-२३ या वर्षाकरीता क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्य योजनेंतर्गत आर्थिक सहाय्य वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- क्रीडासु-३०२३/प्र.क्र.१२/क्रीयुसे-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३१ मार्च, २०२३

वाचा:-

१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. राक्रीधो २०१२/प्र.क्र. २६०/क्रीयुसे-१, दि. ०१ मार्च, २०१४
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. क्रीडासू-३०२२-/प्र.क्र.१०२/क्रीयुसे-१, दि.२९.०६.२०२२
३) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. क्रीडासू-३३२३-/प्र.क्र.१३/क्रीयुसे-१, दि.१७.०३.२०२३
४) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. क्रीडासू-३३२३/प्र.क्र.१३ /क्रीयुसे-१, दि.२९.०३.२०२३
५) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. क्रीडासू-३०२३/प्र.क्र.४६ /क्रीयुसे-१, दि.३१.०३.२०२३
६) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. क्रीसुनि/आर्थिक सहाय्य/२२-२०२१/ का-९ /११५७ दि. १०.०३.२०२२

प्रस्तावना:-

"क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्य करणे" ही क्रीडा धोरणातील एक महत्वाची शिफारस आहे. दर्जेदार क्रीडा सुविधा निर्माण करुन त्याद्वारे खेळाडूंच्या कामगिरीत वाढ करुन राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय खेळाडू निर्माण करण्यास चालना देणे, हे या योजनेचे उद्दिष्ट आहे. या संदर्भातील सविस्तर कार्यपध्दती उपरोक्त संदर्भाधीन क्र. (१) येथील शासन निर्णय दिनांक ०१ मार्च, २०१४ अन्वये विहीत करण्यात आली आहे. राज्यातील खाजगी/शासनाच्या मार्फत चालविण्यात येणाऱ्या व राज्य शासनाच्या संबंधित विभागांनी मान्यता दिलेल्या शैक्षणिक संस्था, स्थानिक/नागरी स्वराज्य संस्था, स्थानिक स्वराज्य संस्थेच्या शाळा, कनिष्ठ महाविद्यालय, आदिवासी विकास विभागाच्या आश्रमशाळा, राज्य शासनाची विभागीय/ जिल्हा/ तालुका क्रीडा संकुले, विविध खेळांच्या विकासासाठी कार्यरत असणाऱ्या व सार्वजनिक विश्वस्त अधिनियम १९५० किंवा संस्था नोंदणी अधिनियम १८६० अन्वये पंजीबध्द असतील अशा व्यायाम संस्था, क्रीडा मंडळे, क्रीडा संघटना इत्यादींना क्रीडा सुविधा निर्मितीस ७५:२५ (शासन: संस्था) याप्रमाणे अनुदान देण्यास तसेच क्रीडा साहित्यासाठी अनुदान देण्यास संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये विहित अटी व शर्तींच्या आधारे मान्यता देण्यात आली आहे. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचेकडून शासनास प्राप्त झालेल्या विविध संस्थांच्या क्रीडा सुविधा /क्रीडा साहित्यास आर्थिक सहाय्याच्या प्रस्तावांना संदर्भाधीन क्र. २ ते ५ येथील शासन निर्णयान्वये

तत्वत: प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तसेच यापूर्वी अंशत: अनुदान (पहिला/दुसरा टप्पा) देण्यात आलेल्या संस्थांचा उर्वरीत निधी मागणीचा प्रस्ताव संदर्भाधीन क्र. ६ अन्वये आयुक्त, क्रीडा व युवक सेवा संचालनालय यांनी शासनास सादर केला आहे. उपरोक्त प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या संस्थांना प्रथम टप्प्याचे अनुदान तसेच यापूर्वी अंशत: अनुदान (पहिला/दुसरा टप्पा) देण्यात आलेल्या संस्थांना पुढील टप्प्यातील अनुदान उपलब्ध करुन देण्याकरीता सन २०२२-२३ या वर्षात आर्थिक सहाय्य उपलब्ध करण्यासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**:-

सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्य या योजनेसाठी अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतूदीमधून रु. ४५७.२९ लक्ष ( अक्षरी रुपये चारशे सत्तावन्न लक्ष, एकोणतीस हजार फक्त ) इतकी तरतूद सोबत जोडलेल्या प्रपत्र-अ, प्रपत्र-ब व प्रपत्र-क मध्ये दर्शविण्यात आल्याप्रमाणे संबंधित संस्थांना अनुक्रमे उर्वरित अनुदान, क्रीडा सुविधा निर्मितीसाठी अनुदान व क्रीडा साहित्य खरेदीसाठी अनुदान त्यांच्या नावासमोर दर्शविल्यानुसार वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. सदर मान्यता खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) शासन निर्णय दिनांक ०१ मार्च, २०१४ मधील परि. क्र. ४ (अ) व ४ (ब) येथील अनुक्रमे क्रीडा सुविधा प्रकल्प व क्रीडा साहित्यासाठीच्या अनुदान मंजुरीच्या सर्व अटी व शर्ती नुसार संबंधित संस्थांना अनुदान वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

२) संबंधित पात्र संस्थांना सोबतच्या प्रपत्र अ, ब आणि क या विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे अनुदान वितरित झाल्यानंतर प्रकल्प पूर्णत्वाचा दाखला, प्रकल्पाच्या छायाचित्रांसह व उपयोगीता प्रमाणपत्रासह लवकरात लवकर व कमाल १ वर्षाच्या कालमर्यादेत सादर करणे बंधनकारक राहील, अन्यथा वितरित अनुदान शासनाच्या प्रचलित दंडनीय व्याज दराने अनुदान वितरीत झाल्याच्या दिनांकापासून वसुल करण्यात येईल, ही अट मान्य असल्याचे हमीपत्र प्रतिज्ञापत्राद्वारे संबंधित संस्थेकडून घेण्यात यावे. तसेच **प्रपत्र ब** मधील संबंधीत संस्थांना एकूण मंजुर करण्यात येणाऱ्या अनुदानाच्या १० टक्के रक्कमेची बँक गॅरेंटी घेणे आवश्यक राहील. त्यानुसार बँक गॅरेंटी व प्रतिज्ञापत्र संबंधीत जिल्हा क्रीडा अधिकारी यांच्याकडे जमा करण्यात आल्यानंतर मंजुर रकमेच्या वितरणासाठी उपलब्ध होणारा निधी संबंधीत संस्थेस आर. टी. जी. एस. प्रणाली व्दारे वितरीत करण्यात यावा. **प्रपत्र क** येथील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे पात्र संस्थांना शासन निर्णयातील अटी शर्तीच्या अधीन राहून क्रीडा साहित्यासाठी अनुदान वितरीत करण्यात यावे. सदर क्रीडा साहित्यासाठी अनुदान दिलेल्या संस्थांना शासन निर्णयातील बाब क्रमांक ४ (ब )येथील अटी शर्ती लागू राहतील.

३) शासन अनुदान व स्वहिस्सा खर्च करुन विनियोग प्रमाणपत्र सादर करणे बंधनकारक राहील. संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णय दि.०१.०३.२०१४ येथील परि.४ (ब) (१०) नुसार क्रीडा साहित्य अनुदानाकरिता शासकीय संस्थांना स्वहिश्शाची अट लागू राहणार नाही.

४) **प्रपत्र ब** मधील संबधित संस्थेकडून स्वहिस्सा २५ टक्के आणि देय अनुदानापैकी या शासन निर्णयान्वये वितरीत केलेले अनुदान प्रथम खर्च करून सदर बांधकामांच्या सद्यस्थितीतील छायाचित्रांसह सनदी लेखापालाच्या स्वाक्षरीचे खर्चाचे विवरणपत्र सादर केल्यानंतरच क्षेत्रीय कार्यालय/संचालनालयाकडून संबंधित संस्थेस उर्वरीत देय रक्कम पुढील आर्थिक वर्षात उपलब्ध तरतूदीच्या अधीन राहून वितरीत करण्यात यावी.

५) संबंधित संस्थेने स्वहिश्याची २५% रक्कम प्रथम खर्च करून वरील अनुक्रमांक (२) मध्ये नमूद केल्याप्रमाणे संबंधित जिल्हा क्रीडा अधिकाऱ्याकडे विवरणपत्र सादर केल्यानंतर संबंधित संस्थेची बँक गॅरेंटी मुक्त करण्यात यावी.

२. उपरोक्त अटींच्या अधीन राहून सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्य योजना (२२०४-५७०६), योजनेंतर्गत, याकरिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतूदीमधून सुधारित अंदाजाच्या मर्यादेत सदर रु.४५७.२९ लक्ष ( अक्षरी रुपये चारशे सत्तावन्न लक्ष, एकोणतीस हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यात यावा.

३. यासाठी होणारा खर्च "मागणी क्र. ई-३ लेखाशिर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४ क्रीडा व खेळ, (४०) क्रीडा सुविधा, (४०) (०१) क्रीडा सुविधा निर्माण करण्यासाठी सहाय्य (कार्यक्रम) (२२०४ ५७०६), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखालील या आर्थिक वर्षाकरिता उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावा.

४. यासंदर्भात वित्त विभाग, परिपत्रक दि.१६.०३.२०२३ अन्वये दिलेल्या सूचनांनुसार व वित्त विभागाने निधी वितरणाबाबत वेळोवेळी दिलेल्या निदेशानुसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी.

५. याकरीता संबंधित जिल्ह्याचे जिल्हा क्रीडा अधिकारी/ लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय, नियोजन विभाग,अनौपचारीक संदर्भ क्र.१७३/१४७१, दिनांक २७.०३.२०२३ व वित्त विभाग,अनौपचारिक संदर्भ क्र.४०४/व्यय-५, दिनांक ३०.०३.२०२३ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३३१२११५३२११२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e9186e40ed4bd4fbaee6, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=41EC78BC14804BABDC24C7FD31BA9FBF63804F499D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2023.03.31 21:20:08 +05'30'

**( रणसिंग डेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राज्यपालांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
४. मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
६. सर्व मा. विधानपरिषद/ विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
७. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
८. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहायक
९. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
१०. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
११. मा. महालेखापाल (लेखाव अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
१२. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३. सर्व विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा (क्रीडा व युवक सेवा संचालनालयामार्फत)
१४. सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी (क्रीडा व युवक सेवा संचालनालयामार्फत)
१५. वित्त विभाग (कार्यासन व्यय-५/अर्थसंकल्प-८) मंत्रालय, मुंबई
१६. नियोजन विभाग (कार्यासन-१४७१) मंत्रालय, मुंबई
१७. निवड नस्ती (क्रीयुसे-१).

(शासन निर्णय, क्र.क्रीडासू-३०२३/प्र.क्र.१२/क्रीयुसे-१, दि.३१ मार्च, २०२३ चे सहपत्र)

## प्रपत्र -अ

क्रीडा सुविधा निर्मिती अंतर्गत यापूर्वी अंशत: अनुदान वितरीत केलेल्या व या शासन निर्णयान्वये अनुदानाचा पुढील टप्पा द्यावयाच्या संस्थेचे नाव.

**रक्कम (रु. लाखांत)**

| अ.क्र. | संस्थेचे नाव | प्रकल्प | राज्य शासन अनुदान मर्यादा (७५%) | यापूर्वी वितरीत अनुदान | | या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | प्रथम हप्ता | एकूण वितरीत अनुदान | |
| १ | दिनदयाळ वनवासी विकास संस्था, संचलित अश्वत्थामा माध्यमिक विद्यालय,जुने धडगाव जि. नंदुरबार | बंदिस्त प्रेक्षागृह | ६७.५० | ३२.५० | ३२.५० | १०.०० |
| | | **एकूण** | | | | **१०.००** |

(शासन निर्णय, क्र.क्रीडासू-३०२३/प्र.क्र.१२/क्रीयुसे-१, दि.३१ मार्च, २०२३ चे सहपत्र)

## प्रपत्र -ब

संदर्भ क्र.२ ते ५ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिलेल्या व या शासन निर्णयान्वये अनुदानाचा प्रथम हप्ता द्यावयाच्या संस्थांची यादी.

रक्कम (रु. लाखांत)

| अ. क्र. | संस्थेचे नाव | प्रकल्प | प्रकल्पाची अंदाजपत्रकीय किमंत | शा.नि.दि.०१.०३.२०१४ नुसार प्रकल्पावरील विहित खर्च मर्यादा | राज्य शासन अनुदान मर्यादा (७५%) | संस्थेचा हिस्सा (२५%) | या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | ऑफिसर्स क्लब, लातूर | जलतरण तलाव | १५१.७० | ५०.०० | ३७.५० | १२.५० | १०.०० |
| २ | भगवान बाबा ग्राम विकास संस्था, येळी, ता. पाथर्डी, जि. अहमदनगर | आठ लेन्सचा धावनपथ | २०.८० | २०.०० | १५.०० | ०५.०० | ०५.२९ |
| ३ | ज्ञानवर्धिनी चॅरिटेबल ट्रस्ट, तळेरे, ता. कणकवली जि. सिंधुदुर्ग | बंदीस्त प्रेक्षागृह | ४२.३१ | ४०.०० | ३०.०० | १०.०० | १०.०० |
| ४ | देवेन्द्र ग्रामविकास प्रतिष्ठाण खुपटी, ता. नेवासा, जि.अहमदनगर | बंदीस्त प्रेक्षागृह | १२५.०० | १२०.०० | ९०.०० | ३०.०० | ३०.०० |
| ५ | ग्रामपंचायत पहुर पेठ ता. जामनेर जि. जळगाव | बंदीस्त प्रेक्षागृह | १२०.२६ | १२०.०० | ९०.०० | ३०.०० | ७०.०० |
| ६ | पहुर ग्रुप एज्युकेशन सोसायटी संचलित आर.टी. लेले हायस्कुल व ज्युनियर कॉलेज, पहुर, ता. जामनेर, जि. जळगाव | बंदीस्त प्रेक्षागृह | ९०.७६ | ९०.०० | ६७.५० | २२.५० | ६०.०० |
| ७ | नगरपंचायत, शेंदुर्णी, ता. जामनेर, जि. जळगाव | बंदीस्त प्रेक्षागृह | ११९.९८ | १२०.०० | ९०.०० | ३०.०० | ७०.०० |
| ८ | महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटी, उदगीर जि. लातूर | ८ लेन्स चा धावनपथ | ३९.७५ | २०.०० | १५.०० | ०५.०० | ०५.०० |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ९ | ग्रामपंचायत कार्यालय, खांडवी ता. बार्शी जि. सोलापूर | बंदिस्त प्रेक्षागृह | ६३.७० | ४०.०० | ३०.०० | १०.०० | १०.०० |
| १० | कै. विठ्ठलराव मंगरुळकर तालीम संघ, अंबड जि. जालना | जलतरण तलाव | १२०.०० | १२०.०० | ९०.०० | ३०.०० | १०.०० |
| ११ | सिपना शिक्षण प्रसारक मंडळ, अमरावती सिपना अभियांत्रिकी महाविद्यालय, अमरावती | बंदिस्त प्रेक्षागृह | १३०.०० | ४०.०० | ३०.०० | १०.०० | १०.०० |
| १२ | सद्‌गुरु वामनराव पै शिक्षण संस्था, कटफ़ळ ता. बारामती जि. पुणे | बंदिस्त प्रेक्षागृह | १४३.०० | १२०.०० | ९०.०० | ३०.०० | ०५.०० |
| १३ | ॲग्रीकल्चरल डेव्हलपमेंट ट्रस्ट, बारामती, जि.पुणे | बंदिस्त प्रेक्षागृह | २५५.८० | १२०.०० | ९०.०० | ३०.०० | २५.०० |
| १४ | ॲग्रीकल्चरल डेव्हलपमेंट ट्रस्ट, बारामती, जि.पुणे | शुटींग रेंज तयार करणे | ५५.८३ | ५०.०० | ३७.५० | १२.५० | १०.०० |
| १५ | छत्रपती संभाजी नगर,महानगरपालिका राजीव गांधी मैदान, सिडको, एन ५, जि.छत्रपती संभाजी नगर | बंदिस्त प्रेक्षागृह | १२०.०० | १२०.०० | ९०.०० | ३०.०० | ५०.०० |
| **एकूण** | | | | | | | **३८०.२९** |

(शासन निर्णय, क्र.क्रीडासू-३०२३/प्र.क्र.१२/क्रीयुसे-१, दि.३१ मार्च, २०२३ चे सहपत्र)

**प्रपत्र -क**

संदर्भ क्र.३ व ५ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिलेल्या व या शासन निर्णयान्वये क्रीडा साहित्यासाठी अनुदान द्यावयाच्या संस्थांची यादी.

**रक्कम (रु. लाखांत)**

| अ.क्र. | संस्थेचे नाव | प्रकल्प | शा.नि.दि.०१.०३.२०१४ नुसार अनुदान | राज्य शासन हिस्सा | संस्थेचा हिस्सा | या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | ग्रामपंचायत बेटावद बु. ता. जामनेर जि. जळगाव | कबड्डी सिथेंटिक मॅट | ०४.०० | ०३.०० | शासन निर्णय दि. ०१ मार्च, २०१४ मधील परि. ४ (ब)१० नुसार शासकीय संस्थाना स्वहिश्याची अट नाही. | ०४.०० |
| २ | ग्रामपंचायत पहूर कसबे ता. जामनेर जि. जळगाव | कुस्ती मॅट | ०५.०० | ०३.७५ | | ०५.०० |
| ३ | ग्रामपंचायत नेरी बु. ता. जामनेर जि. जळगाव | कुस्ती मॅट | ०५.०० | ०३.७५ | | ०५.०० |
| ४ | ग्रामपंचायत पळसखेडे प्र. न. (मिराचे) ता. जामनेर जि. जळगाव | कबड्डी सिथेंटिक मॅट | ०४.०० | ०३.०० | | ०४.०० |
| ५ | ग्रामपंचायत वाकडी ता. जामनेर जि. जळगाव | कबड्डी सिथेंटिक मॅट | ०४.०० | ०३.०० | | ०४.०० |
| ६ | ग्रामपंचायत फत्तेपूर ता. जामनेर जि. जळगाव | कुस्ती मॅट | ०५.०० | ०३.७५ | | ०५.०० |
| ७ | ग्रामपंचायत नेरी दिगर ता. जामनेर जि. जळगाव | कुस्ती मॅट | ०५.०० | ०३.७५ | | ०५.०० |
| ८ | ग्रामपंचायत वाकोद/जांभोळ ता. जामनेर जि. जळगाव | कुस्ती मॅट | ०५.०० | ०३.७५ | | ०५.०० |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ९ | ग्रामपंचायत देऊळगाव गुजरी ता. जामनेर जि. जळगाव | कुस्ती मॅट | ०५.०० | ०३.७५ | | ०५.०० |
| १० | ग्रामपंचायत कवठे, ता. वाई जि. सातारा | कबड्डी सिथेंटिक मॅट | ०४.०० | ०३.०० | | ०४.०० |
| ११ | महानगरपालिका छत्रपती संभाजी नगर,राजीव गांधी मैदान, सिडको, एन ५, जि.छत्रपती संभाजी नगर | जिमनॅस्टिक्स साहित्य | १५.०० | ११.२५ | **निर्णय दि. ०१ मार्च, २०१४ मधील परि. ४ (ब)१० नुसार शासकीय संस्थाना स्वहिश्याची अट नाही.** | १५.०० |
| १२ | महानगरपालिका छत्रपती संभाजी नगर,राजीव गांधी मैदान, सिडको, एन ५, जि.छत्रपती संभाजी नगर | टेबल टेनीस साहीत्य | ०१.०० | ००.७५ | | ०१.०० |
| १३ | महानगरपालिका छत्रपती संभाजी नगर,राजीव गांधी मैदान, सिडको, एन ५, जि.छत्रपती संभाजी नगर | टेनीस साहीत्य | ०१.०० | ००.७५ | | ०१.०० |
| १४ | महानगरपालिका छत्रपती संभाजी नगर,राजीव गांधी मैदान, सिडको, एन ५ , जि.छत्रपती संभाजी नगर | बास्केट बॉल साहित्य | ०४.०० | ०३.०० | | ०४.०० |
| **एकूण** | | | | | | **६७.००** |
| **प्रपत्र अ+ब+क** | | | | | | **४५७.२९** |

**(अक्षरी एकूण रूपये चार कोटी सत्तावन्न लक्ष एकोणतीस हजार फक्त)**